# संकष्ट चतुर्थी

श्री वक्रतुंडाय नम:!

भगवान श्री वक्रतुंडांनी केलेल्या मत्सरासुर निग्रहणाचा कथाभाग आपण मागील चतुर्थीस कथा रुपात पाहिला आता कथनीयाचा विचार करू.

श्रीमद मुदगल पुराणाने आपल्याच आत विद्यमान अष्ट विकारांना राक्षस रुपात वर्णिले. षड रिपु रुपात सर्वत्र वर्णीत काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर आणि ममत्व व अहंकार असे हे आठ असुर.

मात्र येथील गंमत पहा काम, क्रोध, असा त्यांचा क्रम नाही. क्रम नेमका उलटा आहे. मत्सर, मद, मोह करीत कामापर्यंत आणि शेवटी मम व अहंकार असा क्रम कां? तर हा विलयाचा क्रम आहे. तो उलटच असणार आहे.

कोणत्याही प्रवासात पहा एक गोष्ट आपणास सहज कळेल की एका गावाहून आपण दुस-या गावाला निघालो तर मार्गात जी गावे ज्या क्रमाने येतात ती लिहून ठेवा. परतत असतांना तो क्रम नेमका उलटा असणार आहे येथेही हीच रचना आहे.

श्रीगणराज प्रभुंपासून आरंभ पावत आपल्या या देहापर्यंतच्या निर्मितीचा हा भासमान का होईना 'सर्ग' प्रवास झाला. आता 'प्रतिसर्ग' पाहायचा आहे. भगवंतापर्यंत 'परत' जायचे आहे. या परतीच्या प्रवासातील पहिला टप्पा आहे 'मत्सरासुर'.

त्याला शरण आणले तरच पुढचा टप्पा असे करत करत आठ टप्पे. सगळे पार झाले तर आणि तरच 'श्रीस्वानंदनाथ'.

साधकीय अंतर्यात्रेचा पहिला अडथळा आहे मत्सरासुर. अत: प्रथम खंडात त्यालाच असुर संबोधिले आहे.

येथे साधकीय जीवनात घडणारी एक महत्वाची प्रक्रिया खूप शांतपणे समजून घ्यावी लागते.

विविध साधनामार्गांचा, पंथोपंथाचा अंगीकार करून अनेक जण साधनारत होतात. मात्र त्याच वेळी एक विचित्र द्वंद्व सुरु होते. एक मन साधनारत असते तर दुसरे विषयासक्त.

आता आपण साधनेत लागलो म्हणजे आपल्या मनात असे विकार यायलाच नकोत अशा विचित्र धारणेने साधक ग्रस्त होतो. समाज त्याच्या या धारणेला पुष्ट करतो. काहो! गुरु केले नां तुम्ही? तरी असेच कां? हेच कां तुमच्या चतुर्थीचे फल? हीच का मोरयाची उपासना? फायदा काय तुमच्या पारायणाचा? इकडे आध्यात्मिक म्हणवता आणि तिकडे रागावता हे कसे? अशा अगणित प्रश्नांनी साधकाचा गोंधळ अधिकच वृद्धिंगत होत जातो.

या सगळया समस्यांचे परमसुंदर समाधान आहे श्रीमुदगल पुराण..

प्रथम हे ध्यानात घ्यायला हवे की एखाद्याने मोरयाची उपासना 'सुरु केली' याचा अर्थ ती फक्त सुरु झाली आहे. संपली थोडीच आहे? हे बदल उपासनेच्या समाप्तीची फळ आहेत. आरंभात ती कशी मिळतील. विद्यापीठात प्रवेश घेणे आणि पदवी मिळणे यात काही अंतर आहे की नाही? पण हे न समजून घेता साधक गोंधळतो आणि इतर त्याच्या गोंधळास वाढवतात.

उपासनेने हे विकार शमतात हे वास्तव आहे. पण उपासना सुरु करताच ते कसे जातील? २५ वर्षांची जखम असेल तर भरण्यासाठी किमान २५ दिवस तरी द्याल की नाही., उलट जखम होते क्षणात आणि अनेकदा पुरते आयुष्यभर. मग

जर बाल 'जखम' अशी तत्काळ भरत नसेल तर अंतरीचे विकार असे एका सत्यविनायकात कसे मरतील? हा साधा विचारही आपण करत नाही.

अत: श्रीमुदगल पुराणाचे प्रथम कथन आहे की विकार उत्पन्न होतात कां? होऊ द्यात. त्यात अनैसर्गिक असे काहीही नाही. तुमच्या माझ्या सारख्या साधकांच्या मनात ते आले तर काय आश्चर्य देवताही त्यांपासून सुटल्या नाहीत. ऋषीही मुक्त नाहीत.

याच साठी प्रथम असुर मत्सरासुराची निर्मिती वर्णिली आहे देवराज इंद्रापासून साधकाला पहिल्याच टप्प्यावर एक दिलासा दिला आहे की इंद्रालाही मत्सर सुटला नाही. मग तुला तो कसा सोडेल? त्यामुळे तो 'आला' म्हणून वाईट वाटून घेऊ नको, रडू नको, थकु नको.

'आला' यात काही अनैसर्गिक नाही हा 'गेलाच नाही' तर मग घातक आहे. इंद्राने मत्सरासुराचा सांभाळ केलेला नाही त्याने त्याचा 'त्याग' केला त्याग आहे विनाश नाही संपवता येत नाही. इंद्रासच काय विष्णू, शंकरांनाही तो संपवणे शक्य नाही. पण त्याग तर संभव आहे नां? आत्मीयता तर नको नां?

मत्सरासुर प्रगटला आणि इंद्रास स्वत:ची लाज वाटली. असे कथा सांगते. आपल्या विकारवश होण्याची अशी अंतरी लाज वाटणे हाच त्यागाचा आरंभ आहे. आपल्याला अशी लाजच वाटत  नाही उलट अनेकदा आपण त्या विकारांनाच कवटाळून  बसतो. उदा. माझा राग मोठा बेकार आहे बर कां? असे अभिमानाने सांगणारा भेटतो तेव्हा वाटते की याच्या उन्नतीचे दार पक्के बंदच आहे.

श्रीमुदगल पुराण सांगते विकार येतात तर येऊ द्या. ते स्वाभाविक आहे. पण किमान त्यांची जोपासना तर करू नका. कुरवाळत तर बसू नका ते 'आपले' नाहीत असे वाटतील तेव्हाच त्यांच्या निराकरणाचा मार्ग प्रशस्त होऊ शकतो. कारण एकदा 'आपले' म्हटले की मग त्याला धक्काही लागू नये या साठीच आपण प्रयत्न करतो.

अत: प्रथम कार्य आहे इंद्राद्वारे केलेला त्याग. जोपासण्याची वृत्ती सोडणे. अर्थात असा आपले पणा सोडला तरी तो मरत नाही. उलट तो अन्यत्र वाढतोच. त्याचा विस्तार होतोच हे सांगतांना पुराण कारांनी त्याचे तप, त्याचा संसार त्याचा वंशविस्तार वर्णिला आहे. किती सुंदर रूपक आहे हे मत्सरासुराचे पुत्र कोण? तर सुंदरप्रीय आणि विषयप्रिय.

मत्सराचा पसारा कशाने वाढतो? तर सुंदरप्रीयतेमुळे आणि विषयप्रीयतेमुळे. मत्सर नाही मारला जात पण ही मुले मारली जातात. अर्थात जीवनातून सुंदरप्रियता आणि विषयप्रीयता कमी करता येते. या बाबी कमी झाल्या की मत्सर दुबळा होतो.

गंमत पहा पहिल्याच खंडात मत्सरासुर कां? तर या सगळ्या अष्टविकारात सगळयात दुर्बल आहे. सगळयात खाली आहे. म्हणूनच उन्नतीच्या मार्गावर 'खालून पहिला' असल्याने पहिल्या खंडात आला आहे.

मत्सर दुबळा आहे कारण तो दुबळ्याचाच साठी आहे. मत्सर कधीही समर्थास होतच नाही. मत्सर नेहमी आपल्यापेक्षा वरच्याचाच वाटतो. पायी जाणा-यास सायकल वाल्याचा, त्याला गाडी वाल्याचा आणि त्याला विमानातून जाणा-याचा मत्सर वाटू शकतो. विमानातून जाणा-याला पायी चालणा-याचा हेवा, मत्सर, इर्षा वाटली असे कधी होईल कां? उलट तो प्रथम फेरीकरीताही विमानतळावर जात असतांनाही बसच्या रांगेत उभ्या असणा-याकडे तुच्छतेने पाहतो.

अर्थात मत्सर हा नेहमी वरच्याचाच येतो तसे उन्नत होण्याची इच्छा तर आहे पण क्षमता तर नाही अशा विचित्र दशेची परिणती असते मत्सर.

मग मत्सर त्यागाचा उपाय काय? तर एक तर स्वत: सर्वोच्च होणे अथवा सर्वोच्चाचा संग करणे. मोठया पदाशी जुळले तरी मत्सर कमी होतो. उदा. पंतप्रधानाच्या सचिवास कधी ग्रामपंचायत सचिवाचा मत्सर वाटेल कां? तर नाही.

त्याच स्वरुपात एकदा मी सर्वपूज्य सर्वादिपुज्य मोरयाचा भक्त आहे ही भावना दृढ झाली की सामान्य मत्सर हळूहळू गळून पडतात. व्यावहारिक श्रमिक सुखाच्या मागे लागलेल्या सुंदरप्रीय, विषयप्रिय जणांचा मत्सर वक्रतुंड प्रियास वाटणे असंभव आहे. फक्त त्यासाठी वक्रतुंड प्रीयता परमदृढ  असायला हवी.

मत्सराचे कारणच आहे विविधता. माझ्या जवळ जे नाही त्याची मनीषाच मला मत्सरग्रस्त बनवत असते. हे नसले पण जी मनात भरवते तिला माया म्हणतात. माया शब्दाची फोडच आहे मा म्हणजे नाही आणि या म्हणजे जी. ' जी नाही' ती माया. जी नाही त्याचाच विचार करायला लावते तिलाच माया म्हणतात.

माझ्या जवळ नसलेल्या विमानाचा विचार करीत मी मत्सरग्रस्त होतो त्यावेळी माझ्याजवळ असलेल्या गाडीचाही मी आनंद घेऊ शकत नाही. 'नाही' त्याचा विचार करीत 'आहे' त्याचाही आनंद घेऊ देत नाही तीच माया. तीच मत्सराला कारणीभूत असते. मग तिच्या निरासाचा मार्ग काय तर 'वक्रतुंड'.

कशाला म्हणतात 'वक्रतुंड' मराठीचा अर्थ येथे लागत नाही. काही जण वेगळाच अर्थ काढतात सोंड वाकडी म्हणून वक्रतुंड. पण हे लागू पडत नाही कारण सोंड हे तोंड नाही नासिका असते आणि शब्द वक्रतुंड आहे. वक्रनासिका नाही. मग काय आहे वक्रतुंड?

शास्त्र सांगते 'वक्रा' म्हणजे माया. त्या मायेला जो तोंडाने नुसत्या फुंकरीने उडवून लावतो तो परमात्मा, ते परब्रह्म म्हणजे वक्रतुंड. 'नाही' त्याच्या मागे लागण्याची वृत्ती उडवतात ते वक्रतुंड. त्याचा परिणामरूप मत्सर शरण येण्यास बाध्य होतो अशी ज्यांची लीला ते मत्सरासुर निग्रहक श्रीवक्रतुंड.

अर्थात इंद्रासही सुटला नाही म्हणून आपला प्रकटला तर व्यथित न होता सुंदरप्रीयता आणि विषयप्रीयता नष्ट करीत नाही त्याच्यामागे लागण्यापेक्षा 'आहे' त्याचा आनंद घेत मत्सरासुरास श्री वक्रतुंड शरण आणण्याचा साधकीय प्रयास म्हणजे श्री मुदगल पुराणाचा प्रथम खंड.

जय वक्रतुंड!                जय गणेश!

संदर्भ ग्रंथ :- श्री मुदगल पुराण

आपले नम्र:- श्रीमंत दगडूशेठ हलवाई सार्व. गणपती ट्रस्ट, पुणे

अधिक माहिती करता संपर्क

ईमेल: sgpund@rediffmail.com